**ग्राम न्यायालय देवळा व ग्राम न्यायालय त्र्यंबकेश्वर, जिल्हा नाशिक यांचेसाठी प्रत्येकी एक वाहनचालकाचे काल्पनिक पद निर्माण करणेबाबत व सदर पदाच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे कंत्राटी तत्वावर उपलब्ध करुन घेणेबाबत -----------**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदनि २०१२/प्र.क्र.५८/का.१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ११ नोव्हेंबर, २०२०.

**वाचा -**

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः पदनि २५१२/प्र.क्र.१५७/का.१२, दिनांक २७ जानेवारी, २०१५
२ शासन शुद्धीपत्रक विधि व न्याय विभाग क्रमांकः पदनि २५१२/प्र.क्र.१५७/का.१२, दिनांक ०३ फेब्रुवारी, २०१५
३ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः कंत्राटी २०१६/प्र.क्र.१९४/का.१२ दिनांक २३ फेब्रुवारी, २०१७
४ शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक : कंत्राटी २०१६/प्र.क्र.१९४/का.१२, दिनांक ९ ऑगस्ट, २०१७.
५ शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.२९/१६/वित्तिय सुधारणा-१, दिनांक ०२ ऑगस्ट, २०१६
६ प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालय नाशिक यांचे पत्र क्रमांक वित्त/ग्रामन्याया/९९५६/२०१९, दिनांक ०६ डिसेंबर, २०१९

**प्रस्तावना -**

ग्राम न्यायालय देवळा व ग्राम न्यायालय त्र्यंबकेश्वर, जिल्हा नाशिक यांचेसाठी प्रत्येकी एक वाहनचालकाचे काल्पनिक पद निर्माण करण्याची व या पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मंजूरी देण्याची विनंती प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश नाशिक यांचेकडून संदर्भाधीन दिनांक ०६ डिसेंबर, २०१९ रोजीच्या पत्रान्वये करण्यात आली. त्या अनुषंगाने ग्राम न्यायालय देवळा, जिल्हा नाशिक व ग्राम न्यायालय त्र्यंबकेश्वर, जिल्हा नाशिक यांचेसाठी प्रत्येकी एक वाहनचालकाचे काल्पनिक पद निर्माण करण्याची व या पदाच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे कंत्राटी तत्वावर उपलब्ध करुन घेण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने आता शासनाने खालील निर्णय घेतला आहे :

## शासन निर्णय-

नाशिक जिल्ह्यातील ग्राम न्यायालय देवळा व त्र्यंबकेश्वर यांचेसाठी प्रत्येकी एक वाहनचालकाचे काल्पनिक पद निर्माण करण्यास व या पदांच्या सेवा कंत्राटी तत्वावर बाह्ययंत्रणेद्वारे उपलब्ध करुन घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक जे १, २०१४न्यायदान, (००) १०५ दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश, (०२)(०२) ग्राम न्यायालय अधिनियम २००८ अन्वये ग्राम न्यायालयाची स्थापना, (२०१४ ०४७७) दत्तमत" या लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

२. सदर पदे कंत्राटी तत्वावर बाह्ययंत्रणेद्वारे भरताना त्याबाबत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांचे अनुपालन करणे बंधनकारक राहील.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६८२/व्यय-५, दिनांक १३ नोव्हेंबर, २०१८, अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४५९/२०१८/विनियम, दिनांक १३ डिसेंबर, २०१८ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९४/आपुक, दिनांक २० ऑगस्ट, २०२० अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११११४३३२६७६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGYASHREE
RAJENDRA
BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2020.11.11 14:38:26 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानमंडळ सचिवालय,
२. मा.विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र
३. प्रबंधक, (निरीक्षणे १ /२), मा.उच्च न्यायालय मुंबई,
४. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, नाशिक,

५. न्यायाधिकारी ग्राम न्यायालय देवळा / त्र्यंबकेश्वर, जिल्हा नाशिक,

६. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर,

७. जिल्हा कोषागार अधिकारी नाशिक,

८. उप जिल्हा कोषागार अधिकारी नाशिक,

९. वित्त विभाग (व्यय ५ / आपुक)

१०.विधि व न्याय विभाग का.७/११/१३/२३ /२४ /२५

११.कार्यासन १२ (निवडनस्ती)